कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः एलटीएस ११२३/प्र.क्र. २३५/२०२३/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :** शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्रमांक- एलटीएस ११२३/प्र.क्र. २४/२०२३/आ (वर्ग-१), दिनांक ३०.०६.२०२३.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने, संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ३०.०६.२०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करुन, पुढीलप्रमाणे सुधारित पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | बदलीपूर्वी धारण करीत असलेले पद | दिनांक ३०.०६.२०२३ च्या आदेशान्वये पदस्थापना दिलेले पद | सुधारित बदलीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.नंदकिशोर नारायण भामरे | कार्यकारी अभियंता, मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजी नगर. | कार्यकारी अभियंता, पुर्णा पाटबंधारे विभाग, वसमतनगर (सिंचन विभाग), जि.परभणी. | उप अधीक्षक, उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड |
| २. | श्री.संतोष बाबुराव बिराजदार | कार्यकारी अभियंता, पुर्णा पाटबंधारे विभाग, वसमतनगर (सिंचन विभाग), जि.परभणी. | कार्यकारी अभियंता, संकल्पचित्र विभाग क्र.१ (उसिंयो), म.सं.सं., नाशिक. | कार्यकारी अभियंता, पुर्णा पाटबंधारे विभाग, वसमतनगर (सिंचन विभाग), जि.परभणी या सध्याच्या पदावर सन २०२४ च्या सार्वत्रिक बदल्यांपर्यंत मुदतवाढ. |
| ३. | श्री.ईश्वर शंकर पढार | कार्यकारी अभियंता तथा सदस्य सचिव, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | सहायक मुख्य अभियंता, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजी नगर. | कार्यकारी अभियंता तथा सदस्य सचिव, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या सध्याच्या पदावर सन २०२४ च्या सार्वत्रिक बदल्यांपर्यंत मुदतवाढ |

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | बदलीपूर्वी धारण करीत असलेले पद | दिनांक ३०.०६.२०२३ च्या आदेशान्वये पदस्थापना दिलेले पद | सुधारित बदलीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|
| ४. | श्री.अशोक शंकर पवार | कार्यकारी अभियंता, सातारा सिंचन विभाग, सातारा | कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अलोरे, जि.रत्नागिरी | कार्यकारी अभियंता, दुधगंगा कालवे विभाग क्र. १, कोल्हापूर |
| ५. | श्री.उल्हास रामचंद्र पुजारी | कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, कोल्हापूर | उप अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, छत्रपती संभाजी नगर. | कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अलोरे, जि.रत्नागिरी. |

२. संबंधित मुख्य अभियंता (स्थापत्य) यांना कळविण्यात येते की, संबंधित कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत स्थानिक व्यवस्था करुन अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा.

३. संबंधित कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना कळविण्यात येते की, सदर पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व कोणत्या दिनांकास रुजू झाले याबाबत शासनास doesttclass१.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित कळवावे. तसेच, सदर बदलीने पदस्थापना आपल्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने बदलीच्या अनुषंगिक भत्ते देय होणार नाहीत.

४. संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२४०३१५१८३४२४३३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर आदेश जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDDHAV RABHAJI DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV RABHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC57463984588BDF1C37, cn=UDDHAV RABHAJI DAHIPHALE
Date: 2024.03.15 18:44:36 +05'30'

**( उ. र. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव (लाक्षेवि/प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महासंचालक व सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
७) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व सह सचिव/ उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
११) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१२) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
१३) संबंधित अधिकारी.
१४) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
१५) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.